माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या धोरणानुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील कालबाहय व नादुरुस्त संगंणक संचांची विल्हेवाट लावणेबाबत..

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१८५/आस्था-०२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ८ जून, २०१७

संदर्भ: (१) शा. नि. सा.प्र.वि. क्र.मातंस/नस्ती०७/प्र.क्र.८९/३९, दि.१.८.२०११

प्रस्तावना :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भीय शासन निर्णयान्वये ज्या संगणकांचे आयुष्यमान ५ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त झालेले आहे, असे कालबाहय संगणक निर्लेखित करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यास अनुसरून सहकार, पणन वस्त्रोद्योग विभागातील एकूण ३० संगंणक संच कालबाहय व नादुरुस्त असून ते विनावापर विभागाच्या नोंदणी शाखेत पडून असल्याने त्यांची विल्हेवाट लावणे आवश्यक आहे. हे सर्व ३० संगणक माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या अभियंत्यांकडून तपासून घेण्यात आलेले असून त्या संगणकांमधील सर्व डाटा संबंधित अभियंत्यांकडून Clear करून घेण्यात आलेला आहे. त्यामुळे सदर संगणक सामुग्री निर्लेखित करण्यास माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने मान्यता दिलेली आहे. या ३० कालबाहय ठरलेल्या संगणक संचांचा तपशिल सोबतच्या सहपत्रात नमूद करण्यात आला आहे.

शासन निर्णय :-

सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय . क्र.मातंस/नस्ती०७/प्र.क्र.८९/३९, दि.१.८.२०११ मधील तरतूदींच्या व विहीत शर्तींच्या अधीन राहून सहकार, पणन वस्त्रोद्योग विभागातील कालबाहय व नादुरुस्त ठरल्याचे माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने प्रमाणित केलेले एकूण ३० संगंणक संच निर्लेखित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग एक ते पाच अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये सुधारणा करण्याबाबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २२, नियम क्र.१४६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०६०८१४४३३२७००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Geeta H Rane

Digitally signed by Geeta H Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing And Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf016eb71db35b2d39a429504722a049bbb0c7289b5d48579124b6b1719e36b8, cn=Geeta H Rane
Date: 2017.06.08 14:42:55 +05'30'

**( गी. हे. राणे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई ( ३ प्रती )
२. कक्ष अधिकारी, महाऑनलाईन लिमिटेड, डी.आय.टी., ७ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. निवड नस्ती (आस्था-०२)